आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग कार्यालयाच्या आस्थापनेवर निर्माण केलेल्या तांत्रिक गट-ब या संवर्गातील दुग्धशाळा व्यवस्थापक या अधिसंख्य पदास मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र.: दुविप्र -१०२०/०७/प्र.क्र.०३/२०२०/पदुम-६**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:-२६ नोव्हेंबर २०२१

<u>संदर्भ</u> :- १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१/१२/२०१९
२) कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्र.दुविप्र-१०२०/प्र.क्र.०३/२०२०/पदुम-६, दि.११.०८.२०२०
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२७.११.२०२०
४) कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्र.दुविप्र-१०२०/प्र.क्र.०३/२०२०/पदुम-६, दि.२६.०२.२०२१
५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२८.१०.२०२१

**<u>प्रस्तावना :-</u>**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ वरील शासन निर्णय दि.२१.१२.२०१९ अनुसार, संदर्भाधीन क्र.२ वरील शासन निर्णय दि.११.०८.२०२० अन्वये आयुक्त दुग्धव्यवसाय विकास विभाग, महाराष्ट्र राज्य यांच्या आस्थापनेवरील अनुसूचीत जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात प्रमाणपत्र सादर न करू शकलेल्या गट-ब (राजपत्रीत) संवर्गातील श्री.डी.आर.लाखे, दुग्धशाळा व्यवस्थापक यांचेकरीता एक अधिसंख्य पद निर्माण करण्यात आले आहे. सदर अधिसंख्य पदावर सेवा वर्ग झालेल्या श्री.डी.आर.लाखे, दुग्धशाळा व्यवस्थापक यांचा प्रथम ११ महिन्यांचा सेवा कालावधी दिनांक ३१.१२.२०२० रोजी संपुष्टात आलेला होता. तदनंतर संदर्भ क्र.३ अन्वये अशा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांच्या अधिसंख्य पदावरील सेवेस/नियुक्त्यांना अधिसंख्य पदावरील ११ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर पुढील ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी प्राप्त होऊन त्यावर अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्याचा निर्णय संदर्भाधिन क्र.४ अन्वये घेण्यात आला. तदनंतर संदर्भाधिन क्र.५ वरील शासन निर्णय विचारात घेता संदर्भ क्र.२ अन्वये निर्माण केलेल्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, महाराष्ट्र राज्य यांच्या आस्थापनेवरील श्री. डी. आर. लाखे, दुग्धशाळा व्यवस्थापक यांचेकरिता अनुसूचित जमातीच्या राखीव पदावर झालेली मुळ नियुक्ती अवैध ठरल्यामुळे संदर्भ क्र.२ अन्वये निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास, अधिसंख्य पदावरील ११ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आलेल्या दिनांकापासून पुढील ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. श्री.लाखे यांचा सेवा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम | संवर्ग | सेवानिवृत्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.डी.आ.लाखे | दुग्धशाळा व्यवस्थापक | गट-ब (राजपत्रित) | दि.३१.०८.२०२२ |

२. हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.बीसीसी-२०१८/ प्र.क्र.३०८/ १६-ब, दि.२७.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२१११२६१६१८२७७५०१ असा आहे. हे शासन आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANJAY JAGANNATH SAVANE

Digitally signed by SANJAY JAGANNATH SAVANE
DN: CN = SANJAY JAGANNATH SAVANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = AGRICULTURE AND ADF DEPARTMENT
Date: 2021.11.26 16:20:59 +05'30'

**( सं.ज.सवने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) प्रधान सचिव(पदूम), कृषि व पदूम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, वरळी, मुंबई.
३) प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, नागपूर.
४) महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) १/२, मुंबई/नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया/नागपूर
७) श्री. डी. आर. लाखे, दुग्धशाळा व्यवस्थापक (आयुक्त,दुग्धव्यवसाय विकास विभाग यांचे कार्यालयामार्फत)
८) मा.मंत्री (पदुम) यांचे स्वीय सहायक.
९) निवडनस्ती.